**कोषागारातून रोख देय अनुदान**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सर्वसाधारण घटक जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदान वितरण करणेबाबत

**(लेखाशीर्ष २२१५ ९८३५)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१८/प्र.क्र.१७३/पापु-१६**
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: २९ जानेवारी, २०१९.

वाचा

**केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्रमांक:**एस-१८०१३/२/२०१४-O/०डीआयआर(एसबीएम) भाग-१, दिनांक १४ मार्च, २०१८.

**प्रस्तावना :**

उपरोक्त येथील केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या मंजूरी आदेशान्वये राज्य शासनास केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदानाकरिता एकूण रु. ५९८८.०० लक्ष एवढा निधी वितरित करण्यात आलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने कळविले आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) योजनेंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता सर्वसाधारण घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदानाकरिता एकूण रु. ५९८८.०० लक्ष (रूपये एकोणसाठ कोटी,अठ्ठ्याऐंशी लक्ष फक्त ) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सर्वसाधारण घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदानापोटी प्राप्त निधी रुपये ५९८८.०० लक्ष (रूपये एकोणसाठ कोटी,अठ्ठ्याऐंशी लक्ष फक्त) इतकी रक्कम संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था यांचे अधिनिस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

२. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनिस्त ठेवण्यात आलेली रूपये ५९८८.०० लक्ष (रूपये एकोणसाठ कोटी,अठ्ठ्याऐंशी लक्ष फक्त) एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रूपये ५९८८.०० लक्ष (रूपये एकोणसाठ कोटी,अठ्ठ्याऐंशी लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्री. एल.ए. जाधव), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव तथा प्रकल्प संचालक,सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री. अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.सदर रक्कम रूपये ५९८८.०० लक्ष (रूपये एकोणसाठ कोटी,अठ्ठ्याऐंशी लक्ष फक्त) इतकी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), (श्री. एल.ए. जाधव),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.”

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदा/संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार खर्च करण्यात यावी.संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्र.२-अ आणि २-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षी दिनांक ३१ मार्च २०१९ पूर्वी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

उ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऊ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा खर्च " मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामसफाई कार्यक्रम, (०२) (१०) निर्मल भारत अभियान केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (सर्वसाधारण घटक) (केंद्र हिस्सा) (२२१५ ९८३५), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) " या लेखाशीर्षाखाली घालावा.सदर अनुदान सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील तसेच परिशिष्टातील अ.क्र.८ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

६. सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्याबाबत नियोजन विभाग अनौ.संदर्भ क्रमांक २४६/१४४३, दिनांक १६/१/२०१९ व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्रमांक ४४/अर्थोपाय दिनांक २४/१/२०१९ अन्वये मान्यता प्राप्त झाली आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१५००१९८८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2019.01.29 16:51:10 +05'30'

(स्मि.स.राणे)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. अपर मुख्य सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता).
५. विभागीय आयुक्त, सर्व.
६. उपायुक्त, विकास/आस्थापना, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
७. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
११.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१२.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
१३.उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१५.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१६.नियोजन विभाग, (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई.
१७.आदिवासी विकास विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई.
१८.वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
१९.कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०.निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.